**कृती आराखडया अंतर्गत कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण करणे या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेस सन २००९ -१० मध्ये पुनर्विनियोजनेद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- कृषिचि २९०९/प्र.क्र. १५८/३-अे,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१०.

**संदर्भ :-**१) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२००९-एमएम, दि. ३० जुन, २००९
२) केंद्रीय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२००९-एमएम, दि. ९ जुलै, २००९
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक जा.क्र./कृआ/विप्र-७/२००९-१०/३५६/०९, दि.९ जुलै, २००९.
४) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक जा.क्र.नियोजन-२/कृआ०९१०/२७१/२००९, दि.१८ जुलै, २००९.
५) शासन निर्णय क्रमांक : कृषिचि २९०९/प्र.क्र. १५८/३-अे, दिनांक : २९ जुलै, २००९
६) केंद्रिय कृषि मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.६-६/२००९-एमएम,दि. २५ जानेवारी, २०१०.
७) कृषि आयुक्तालयाचे क्र.जा.क्र.:- विप्र -५/कृचि/तरतुद/ १२३/२०१० दि. ९ फेब्रुवारी, २०१०
८) शासन निर्णय क्रमांक : कृषिचि २९०९/प्र.क्र. १५८/३-अे, दिनांक : ८ मार्च, २०१०
९) कृषि व पदुम विभागाच्या शासन निर्णय क्र. पुनर्वि १००९/भाग १०/प्र.क्र. १९४/०९/२-ए, दि. ३१ मार्च, २०१०

**प्रस्तावना:-**

विकसित कृषि तंत्रज्ञानाचा प्रसार व प्रचार शेतकऱ्यांपर्यन्त प्रभावीपणे व जलदगतीने होऊन त्याद्वारे शेतकऱ्यांना त्या-त्या भागातील प्रमुख पिकांचे उत्पादन व उत्पादकता वाढविण्याचे उद्दिष्ट विचारात घेऊन सन १९९७-९८ पासून राज्यात एकूण २३१ कृषि चिकित्सालये स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. केंद्रीय कृषि मंत्रालयाने त्यांच्या दि.३० जुन, २००९ च्या पत्रान्वये दिलेल्या मान्यतेनुसार ही योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यास संदर्भाधिन क्रमांक ५ अन्वये रु.२३०.०० लक्ष च्या कार्यक्रमांस प्रशासकीय आणि रु.१००.०० लक्ष च्या कार्यक्रमांस वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच केंद्र शासनाने संदर्भाधिन दिनांक २५ जानेवारी, २०१० च्या पत्रान्वये दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरित केल्यानुसार या विभागाने उपलब्ध तरतुदीच्या मर्यादेत रु. ६५.०० लक्षचा निधी संदर्भाधीन क्र. ८ अन्वये वितरित केलेला आहे. या व्यतिरिक्त सन २००९- २०१० करिता संदर्भाधीन क्रमा्क ९ च्या शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण करणे** ही १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेस केंद्र शासनाने रु २३०.०० लक्षच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेच्या अधीन राहून या योजनेचा कार्यक्रम राबविण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णय क्र.५ अन्वये १००.०० लक्ष (रु. एक कोटी फक्त) व संदर्भाधीन शासन निर्णय क्र.८ अन्वये ६५.०० लक्ष असे एकूण रु. १६५.०० लक्ष (रुपये एक कोटी पासष्ट लक्ष फक्त) इतक्या रक्कमेस वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. या व्यतिरिक्त सन २००९-१० करिता संदर्भाधीन क्रमांक ९ च्या शासन निर्णयान्वये पुनर्विनियोजनान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला रु. ६५.०० लक्ष निधी (रुपये पासष्ट लाख फक्त) निधी मुक्त करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२.	हा मंजूर केलेला **रु. ६५.०० लक्षचा (रु. पासष्ट लक्ष मात्र)** निधी खर्च करण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना **आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे. राज्यातील संबंधित कृषि सह संचालक अथवा अन्य अधिकारी यांना आवश्यकतेनुसार या मंजूर निधीचे वाटप करण्यास आणि त्याच्या वापराबाबत आवश्यक मार्गदर्शक सूचना देण्यास संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर निधीचे वाटप वित्त विभागाने विकसित केलेल्या संगणकिय अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत करण्यात यावे. सदर निधी खर्च करताना तो मासिक कॅश-फ्लोच्या मर्यादेत राहील याची जबाबदारी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांची राहील.

३.	केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचना, मार्गदर्शक तत्वे तसेच शासनाचे प्रचलित नियम व अटीनुसार खर्च करण्यात यावा. मंजूर निधीचा विनियोग **राज्यातील स्थापित केलेल्या २३१ कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण करण्याकरिता उपरोक्त निधी २१ पुरवठा व सामुग्री (२४०१ ४०९८) यासाठी उपयोगात आणावा, तसेच सदरहू निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र (Utilization Certififcate) विहित कालावधीत केंद्र शासनास सादर करण्याची दक्षता संचालक, (विस्तार व प्रशिक्षण) यांनी घ्यावी.**

२.	सन २००९-१० मध्ये याप्रित्यर्थ होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व योजनेच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**मागणी क्र.डी-३**
**२४०१, पीक संवर्धन**
**१०९ विस्तार व प्रशिक्षण**
**(०१) (३६) कृषि चिकित्सालयाचे बळकटीकरण**
**पंचवार्षिक योजनांतर्गत योजना/ १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना**
**२१ पुरवठा व सामुग्री (२४०१ ४०९८ )**

४.	हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदभ क्र. ८८/१० /व्यय-१, दिनांक ३१ मार्च, २०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार प्रधान सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५.	सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००४०८१८२०३८००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**[ वीणा राऊत ]**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

प्रति,

कृषी आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,

संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० जादा प्रतींसह)
सर्व संचालक / सर्व सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
कृषि सहसंचालक (विस्तार), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व  जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
सर्व तालुका कृषि अधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर,
सहसंचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासन भवन, मुंबई,
सर्व  जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प-१२), मंत्रालय, मुंबई-३२
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सर्व सह/ उप सचिव / अवर सचिव (कृषी विभाग),कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव,
कार्यासन २-अे, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती (कार्यासन ३-ए)